महाराष्ट्र शासन

**क्रमांक: बीयुडी.-१६२४/प्र.क्र.९१/विमान-१**
**सामान्य प्रशासन विभाग,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २३ जुलै, २०२४

**विषय :- मिहान प्रकल्पाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस अनुदान वितरीत करणेबाबत.**

**वाचा** :-१.वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३,दि.१.०४.२०२४
२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र.मविविकं/२०२४/वित्त व लेखा/२९६, दि.०७.०६.२०२४ व क्र.मविविकं/ २०१५/प्र.क्र.१९९/भूस/पुर्न, दिनांक २०/६/२०२४

**शासन ज्ञापन** :-

मिहान प्रकल्पातील भूसंपादन, पुनर्वसन व १२.५% सानुग्रह अनुदान व भारतीय वायुदलाच्या मौजा जयताळा येथील पोच रस्ता बांधकामासाठी तसेच दिवाणी न्यायालयातील कलम १८ व २८ खालील दाव्यांसाठी लेखाशीर्ष ३०५३ ०१७३ खाली ३५- भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३ ०१७३ खाली रु. ४२५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केला आहे.

२. उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत नियोजन व वित्त विभागाने रु.१४२.०० कोटी (रुपये एकशे बेचाळीस कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. सदरहू निधी मिहान प्रकल्पासाठी खालील तक्त्यातील स्तंभ क्र.२ मधील लेखाशीर्षासाठी स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी यांना वितरीत करण्यास या शासन ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(रूपये कोटीमध्ये)**

| अ.क्र. | बाब क्र. | लेखाशीर्ष | सन २०२४-२५ अर्थसंकल्पित तरतूद | या शासन ज्ञापनान्वये वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ |
| १. | कलम१८ अंतर्गत | ३०५३ ०१७३ | रू.४२५.०० | रु. ७०.०० |
| **२.** | कलम २८ अंतर्गत | | | रु. २०.४५ |
| **३.** | झुडपी जंगल | | | रु. २.३८ |
| **४** | प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसनाकरीता | | | रु. ४९.१७ |
| | | | **एकूण** | **रु. १४२.००** |

३. उपरोक्त खर्च "**मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमान चालन, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (००) (०३) मिहान प्रकल्पाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान**

**(कार्यक्रम) (३०५३ ०१७३) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान"** या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या अर्थिक वर्षाकरिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. बिम्स प्रणालीवर निधी वितरणासाठी सह सचिव/उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन,मंत्रालय,मुंबई (A००३६)) हे नियंत्रक अधिकारी म्हणून नमूद करण्यात आले आहेत. सबब, सदर निधी बिम्स प्रणालीवर सह सचिव /उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (विमानचालन),मंत्रालय,मुंबई यांना वितरीत करण्यात यावा. संचालनालय स्तरावर देयके अदा करण्यासाठी संचालक, विमानचालन,मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकास कामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो दि.३१ मार्च २०२५ पूर्वी खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला निधी कोषागारातून आहरीत करण्यापूर्वी तसेच, खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतुदी तसेच, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४ मधील मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. सदर शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ३२५/का-१४४३, दि.२७/०६/२०२४ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ४१५/व्यय-४, दिनांक २९/०६/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२४०७२३१६२४२४६२०७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJASHREE S HIRLEKAR

Digitally signed by RAJASHREE S HIRLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=a2696592d5d84825b5aed6905fd0b9e9dd2c6726eb5ebc44e78c6af282fc9b0d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9182EA9A54D76E6216129AD842EA023F173D8083DBD47F2CF1041DA3010B16D6, cn=RAJASHREE S HIRLEKAR
Date: 2024.07.23 17:46:34 +05'30'

**( राजश्री हिर्लेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
३. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई.
४. महालेखापाल, ( लेखा परिक्षा)/ (लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, कार्या-व्यय ४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्या-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती (कार्या-विमान-१)